सातारा सैनिकी शाळेच्या नुतनीकरणासाठी रु.८४.६२ कोटी इतका निधी ठेव व अंशदान स्वरुपात वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. सासैशा-२०२१/प्र.क्र.१५१/एसएम-६**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ३० मार्च, २०२२**

**वाचा :**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र क्र. मुअपु/का-२/इमा/५५५२/२०२१ दि. ०३/११/२०२१
२) शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक यांचे पत्र क्र. सैशासा/शा.नु./२०२०-२१/ माध्य-ब/एस-५/४००८ दि. १८/११/२०२१
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. सासैशा २०२१/ प्र.क्र.१५१/ एसएम-६ दि. ११.०१.२०२२
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
५) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०३.०२.२०२२
७) प्राचार्य, सैनिक स्कुल,सातारा यांचे पत्र क्र. १४१/S/A दि. १०/०२/२०२२
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १७.०३.२०२२
९) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. सासैशा २०२१/ प्र.क्र.१५१/ एसएम-६ दि. १६.०३.२०२२

**प्रस्तावना :**

सातारा सैनिक शाळेची स्थापना दिनांक २३ जून, १९६१ रोजी झाली असून ही देशातील पहिली सैनिकी शाळा आहे. सातारा सैनिक शाळेचा परिसर ११५ एकर सरकारी जागेमध्ये आहे. या परिसरातील काही इमारती ब्रिटीश काळातील असून काही इमारती सन १९६१ मध्ये सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत बांधण्यात आलेल्या आहेत. त्यांचे बांधकाम जुन्या पध्दतीचे असून सदर इमारती धोकादायक झालेल्या आहेत. सातारा सैनिक स्कूल नियमावलीतील नियम क्र. १५.०४ नुसार, तसेच दिनांक ६.१२.२०१६ रोजी झालेल्या सामंजस्य करारानुसार सातारा सैनिक शाळेच्या इमारत देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी राज्य शासनाची आहे.

सातारा सैनिकी शाळेच्या नूतनीकरणाचा रु. २९९.२८ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकाचा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम, प्रादेशिक विभाग, पूणे यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. सदर प्रस्ताव तांत्रिक तपासणीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागास सादर केला असता सार्वजनिक बांधकाम विभागाने किंमतीची परिगणना करुन रु. २८५.१६ कोटी

रकमेच्या प्रस्तावास अटींच्या अधिन राहून सहमती दर्शविली आहे. तसेच शासकीय इमारतीच्या बांधकामांना मंजूरी देण्याबाबत गठीत उच्चाधिकार सचिव समितीच्या दिनांक २९/११/२०२१ रोजीच्या बैठकीत सदर प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सातारा सैनिक शाळेच्या नूतनीकरणासाठी रु. २८५.१६ कोटी रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

२. सातारा सैनिकी शाळेच्या नुतनीकरणाचे बांधकाम विहित कालावधीत पूर्ण होण्यासाठी प्राचार्य, सैनिक स्कूल सातारा यांनी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात रु. १००.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची मागणी संदर्भाधीन क्र. (७) येथील पत्रान्वये केली आहे. प्रस्तुत बांधकामासाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात संदर्भ क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रीडा, कला,व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०५) सैनिकी शाळांचे बांधकाम (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे या लेखाशिर्षाखाली रु. १५.३८कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद वितरीत करण्यात आली असून उर्वरीत ८४.६२ कोटी इतकी पूरक मागणीद्वारे उपलब्ध तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :</u>**

सातारा सैनिक शाळेच्या नुतनीकरणासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात, वितरीत निधी विहित पध्दतीने खर्च केला जाईल व वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून रु. ८४,६२,००,०००/- (रुपये चौ-यांशी कोटी बासष्ट लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. ई-४, ४२०२- शिक्षण, क्रीडा, कला,व संस्कृती यावरील भांडवली खर्च, ०१ सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०५) सैनिकी शाळांचे बांधकाम (कार्यक्रम), (४२०२ ६४३३), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, सातारा यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी कामाबाबतचा प्रगती अहवाल वेळोवेळी शासनास सादर करावा व याबाबत महालेखापाल कार्यालयाशी ताळमेळ करुन त्याबाबतचा अहवाल देखील शासनास सादर करावा.

४. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शक सूचनांचे, वित्तीय नियमावली व कार्यपध्दतीचे तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,दिनांक १७.०३.२०२२ मधील आदेशांचे काटेकोर पालन करणे आवश्यक राहील.

५. सदर आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १२९/१४७१, दिनांक २२.०३.२०२२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३८५/२०२२/व्यय-५, दि. २५/०३/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.,maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३३०१८२९५२४९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.03.30 18:31:56 +05'30'

**( समीर सावंत )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
२. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
३. मा. विरोधी पक्ष नेता विधान सभा/विधानपरीषद, विधानभवन, मुंबई-३२.
४. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ३२.
५. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्विय सहायक.
१०. आयुक्त ( शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. जिल्हाधिकारी, सातारा.
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. सातारा.
१३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
१४. शिक्षण संचालक ( माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१५. शिक्षण संचालक ( प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. विभागीय शिक्षण उप संचालक,पुणे विभाग, पुणे.
१७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सातारा.
१८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
१९. शिक्षणाधिकारी ( माध्यमिक ) जिल्हा परिषद सातारा.
२०. शिक्षणाधिकारी ( प्राथमिक ) जिल्हा परिषद सातारा.
२१. कक्ष अधिकारी, (इमा-३), सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई.

२२. कक्ष अधिकारी , (कार्यासन १४७१) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३. कक्ष अधिकारी , (व्यय ५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. कक्ष अधिकारी( अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२५. निवडनस्ती (एसएम -६).